कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांनी उत्पादीत केलेल्या सर्व वस्तूं जिल्ह्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/ शिधावाटप दुकानामध्ये विक्रीसाठी ठेवण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. साविव्य-१७१८/१५८१/प्र.क्र.२९९/नापु-३१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८.

वाचा :
१. शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक साविव्य-२०१७/५६/प्र.क्र.२४/नापु-३१, दिनांक १९ जानेवारी, २०१८.
२. शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक साविव्य-२०१७/५६/प्र.क्र.२४/नापु-३१, दिनांक ०९ मार्च, २०१८.
३. शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक साविव्य-२०१८/अनौ.सं.०३/प्र.क्र.८५/नापु-३१, दिनांक ०५ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व अधिकृत रास्तभाव दुकानदारांचे उत्पन्न वाढावे यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्यादित, मुंबई (महानंद) या दुग्धशाळेचे दूध व दुग्धजन्य पदार्थ राज्यातील सर्व अधिकृत रास्तभाव दुकानामध्ये विक्रीस ठेवण्यास शासन निर्णय दिनांक १९ जानेवारी, २०१८ व दिनांक ९ मार्च, २०१८ अन्वये व महाराष्ट्र राज्यातील शासकीय दूध योजनेत उत्पादित होणाऱ्या दूध व दुग्धजन्य तसेच आरे ब्रँडचे दूध व दुग्धजन्य पदार्थांचे वितरण राज्यातील शिधावाटप केंद्रांमधून विक्री करण्यास शासन निर्णय दिनांक ५ एप्रिल, २०१८ अन्वये परवानगी देण्यात आली आहे. तसेच नोगा उत्पादने राज्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/ शिधावाटप दुकानामध्ये विक्रीसाठी ठेवण्यास शासन निर्णय दिनांक २७ एप्रिल, २०१८ अन्वये परवानगी देण्यात आली आहे.

त्याच धर्तीवर कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांनी उत्पादीत केलेल्या सर्व वस्तूं जिल्ह्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/ शिधावाटप दुकानामध्ये विक्रीसाठी ठेवण्यास परवानगी देण्याबाबत विनंती कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांनी केली आहे. त्यानुसार जिल्ह्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/शिधावाटप दूकानांतून कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांनी उत्पादीत केलेल्या सर्व वस्तूं जिल्ह्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/ शिधावाटप दुकानामध्ये विक्रीसाठी ठेवण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील रास्तभाव दुकानदारांचे उत्पन्न वाढावे यासाठी, सद्यस्थितीत जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांनी उत्पादीत केलेल्या इको फ्रेंडली डास प्रतिबंधक मिश्रणे, इको फ्रेंडली सॅनीटरी नॅपकिन्स व इतर खादी आणि ग्रामोद्योग यांच्याकडील उपलब्ध असलेल्या सर्व वस्तू कोल्हापूर जिल्ह्यातील सर्व अधिकृत रास्तभाव/शिधावाटप दूकानामध्ये विक्रीसाठी ठेवण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांच्या अधिकृत वितरकांमार्फत कोल्हापूर जिल्ह्यात रास्तभाव दुकानांपर्यंत वितरण करण्यात येईल.

३. कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांची उत्पादने विक्रीपोटी मिळणाऱ्या कमिशनसाठी संबंधित रास्तभाव दुकानदारांनी संबंधित योजनेंच्या वितरकांशी व कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर यांच्या विभागीय कार्यालयाशी परस्पर संपर्क साधणे आवश्यक राहील. हा व्यवहार कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामोद्योग संघ, कोल्हापूर व संबंधित रास्तभाव दुकानदार यांच्यामध्ये राहील. यात शासनाचा कोणताही सहभाग अथवा हस्तक्षेप राहणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१०१५०५००९९०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.10.10 15:19:23 +05'30'

**( भा. बा. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
५. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
७. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
८. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
९. मा. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
१०. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
११. उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे.
१२. जिल्हा पुरवठा अधिकारी, कोल्हापूर.
१३. अध्यक्ष, कोल्हापूर जिल्हा खादी ग्रामाद्योग संघ, कोल्हापूर, सोसायटी ॲक्ट नं.३४४०, पब्लिक संघ नं.ई-१३, ७१४ बी वॉर्ड, रविवार पेठ, बिंदू चौक, कोल्हापूर-४१६००२.
१४. हेल्थ केअर इंडिया ( अधिकृत वितरक १६५३, ई ) वार्ड, राजारामपुरी, कोल्हापुर.
१५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१६. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व सह सचिव, उप सचिव , अवर सचिव व कक्ष अधिकारी.
१७. उपसंचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१८. उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा)परळ, मुंबई.
१९. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई.
२०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे कार्यालय , मुंबई.
२१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन , मुंबई (१०प्रती).

२३. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती).

२४. अध्यक्ष, ऑल महाराष्ट्र फेअर प्राईज शॉपकिपर्स फेडरेशन, पुणे, व्दारा गुप्ता जनरल स्टोअर्स, अन्सारी काट्यासमोर, काळभोर नगर, चिंचवड, पुणे ४११ ०१९.

२५. अध्यक्ष, अखिल महाराष्ट्र राज्य स्वस्त धान्य दुकानदार, केरोसीन परवाना धारक महासंघ, साई भगित्रा निवास, एन-४ सिडको, ए.सी. प्लॉट नं.९, औरंगाबाद.

२६. अध्यक्ष, मुंबई रेशन दुकानदार संघटना, ओरिएन्टल हाऊस, ७ जे टाटा मार्ग, मुंबई.

२७. निवड नस्ती,कार्यासन ना.पु.३१.